केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यक्रमांसाठी सर्वसाधारण योजनेंतर्गत (General ) सन २०१६-१७ करीता राज्य हिश्श्यापोटी रु. ३६०४.०२ लक्ष अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सा.आ.वि.३००११/प्र.क्र. १०२६/२०१६/आरोग्य-७**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ३१ मार्च, २०१७

वाचा :-

१) केंद्र शासन, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. No. T-१८०१५/५/४६/२०१६IDSP, दिनांक १९ जानेवारी, २०१७.
२) केंद्र शासन, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. No. W-११०३६/१/Gen/२०१६-Lep (Pt-I), दिनांक ५ जानेवारी. २०१७.
३) केंद्र शासन, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. No. ४-१०/२०१६-१७/NVBDCP/ Accts/ GIA/states, दिनांक २१ डिसेंबर, २०१६.
४) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. L.१९०१२/१५/२०१६-UH, दिनांक २६ डिसेंबर, २०१६ चे आदेश ४१४१.००
५) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. L.१९०१२/१५/२०१६-UH, दिनांक २६ डिसेंबर, २०१६ चे आदेश ६६९.००
६) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७-२३/२०१६-NHM(Finance)/५, दिनांक ३०, सप्टेंबर २०१६ चे आदेश २००५.००
७) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७-२३/२०१६-NHM(Finance)/६, दिनांक ३०, सप्टेंबर २०१६ चे आदेश २२३.००

८) केंद्र शासन, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. No. L-१९०१५/९/२०१६-TB, दिनांक११ नोव्हेंबर, २०१६.

९) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक यांच्या कार्यालयातील संचालक, वित्त व लेखा यांचे पत्र क्र. राआसोम/एफएमजी/रा.हि./१३०७४७-७४७, दिनांक २५ मार्च, २०१७.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह, सर्व गरजू प्रकारच्या आरोगय सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनराने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले. सन २०१४-१५ मध्ये केंद्र शासनाने आरोगय विषयक सर्व केंद्र पुरस्कृत योजना एकत्रित करुन त्यास "राष्ट्रीय आरोग्य अभियान" असे नाव दिले. या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आता राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानातील राष्ट्रीय रोग नियंत्रण कार्यक्रम या केंद्र पु रस्कृत योनांचा समावेश केला आहे. राष्ट्रीय आरोग्य अभियानातील राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान व अन्य केंद्र पुरस्कृत योजनांकरीता सर्वसाधारण योजनेंतर्गत सन २०१६-१७ मध्ये केंद्र शासनाने केंद्र हिश्श्यापोटी वितरीत केलेल्या अनुदानाच्या अनुषंगाने राज्य हिश्श्याचे अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०१६-१७ मध्ये राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यान्वित असलेल्या केंद्र पुरस्कृत योजना व कार्यक्रम याकरीता केंद्र शासनाने वितरीत केलेल्या केंद्र हिश्श्यास अनुरुप सर्वसाधारण योजनेंतर्गत (General) सन २०१६-१७ मधील राज्य हिस्सा पुढीलप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

## परिशिष्ट

**सन २०१६-१७ साठी राज्य हिस्सा** **(रु. लाखात)**

| अ. क्र. | योजना व लेखाशिर्ष - मागणी क्र.आर-१,२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६ -आरोग्य सेवा, ८००- इतर खर्च पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना केंद्र पुरस्कृत योजना (राज्य हिस्सा ४०%), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) | | वितरीत निधी (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान (NUHM) | (०१) (२०) २२१०F१७५ | १६४२.८२ |
| २ | सुधारीत राष्ट्रीय क्षयरोग नियंत्रण कार्यक्रम (RNTCP) | (०१) (२२) २२१०F१९३ | १८५४.७९ |
| ३ | राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रम (NVBDCP) | (०१) (२४) २२१०F२१९ | १.०१ |
| ४ | राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रम (NLEP) | (०१) (२८) २२१०F२५५ | ०.०१ |
| ५ | राष्ट्रीय अंधत्व निर्मुलन कार्यक्रम (NPCB) | (०१) (३०) २२१०F२७३ | ०.०१ |
| ६ | राष्ट्रीय मानसिक आरोग्य कार्यक्रम (NMHP) | (०१) (३२) २२१०F२९१ | २५.७२ |
| ७ | राष्ट्रीय वृध्दापकाळ आरोग्य सुश्रुषा कार्यक्रम (NPHCE) | (०१) (३४) २२१०F३१७ | ६७.४३ |
| ८ | राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण आरोग्य कार्यक्रम(NTCP) | (०१) (३८) २२१०F३५३ | ०.०१ |
| ९ | राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, हृदयरोग आणि पक्षाघात प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रम (NPCDCS) | (०१) (३२) २२१०F३९१ | ०.०१ |
| १० | एकात्मिक रोग सर्वेक्षण प्रकल्प (IDSP) | (०१) (२६) २२१०F२३७ | १२.२१ |
| | एकूण | | ३६०४.०२ |

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, कुटुंब कल्याण तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपूर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.) आरोग्य सेवा, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च उपरोक्त परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या लेखाशिर्षानुसार संबंधित लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१६-१७ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१३प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३ , दि. २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१२६/१४७२, दिनांक २० मे, २०१६ आणि वित्त विभागाच्या क्रमांक ३९/व्यय १३, दिनांक २२ फेब्रुवारी, २०१६ व क्र.२११/२०१६/व्यय-१३, दिनांक १ जुलै, २०१६ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. वित्त विभागाच्या क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ च्या परिच्छेद ७ ते १८ व सोबतच्या परिशिष्टामधील अनु. क्र.३ व ९ मध्ये नतूद केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोगय सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यातयेणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या

संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होतो, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२७१९१९४२१६१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: CN = Sanjay R More, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.03.31 17:20:29 +05'30'

**( सं. रा. मोरे )**
**महाराष्ट्र शासनाचे उप सचिव**

प्रत,

१. महालेखापाल( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
६. सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग ( अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१३. निवडनस्ती (आरोग्य-७)